**शासकीय फळरोपवाटिका येवला, ता. येवला, जि.नाशिक येथील प्रशिक्षण हॉल दुरुस्ती व तालुका फळरोपवटिका, तिसंगी (रत्नागिरी) आणि चाविंद्रा (ठाणे) येथील दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता व सदर रक्कम वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- फरोवा-२०१९/प्र.क्र.१७५/१३-अे,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०२ मार्च, २०२०

**संदर्भ** :-१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१/४/२०१९.
२) कृषि व पदुम विभाग शा.नि.क्र.लेखानु-२०१९/प्र.क्र.२३/१९/२-अे, दि. १२/०७/२०१९.
३) कृषि व पदुम विभाग शा.नि.क्र. फरोवा-२०१९/प्र.क्र.७४/१३-अे, दि. २३/०४/२०१९.
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/शरोवा-अवि १७२२/७२५६/२०१९. दि.२९/११/२०१९.
५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/शरोवा-अवि १७२२/६८७८/२०१९. दि.२७/११/२०१९

**प्रस्तावना:-**

भाजीपाला रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने (अनिवार्य) (२४०१ १७२२) या लेखाशिर्षातर्गत बाबीपैकी २७- लहान बांधकामे बाब वगळता इतर बाबींसाठी माहे डिसेंबर २०१९ अखेरच्या खर्चासाठी अर्थसंकल्पीय वितरणप्रणालीव्दारे निधी वितरित करण्यात आला आहे. या लेखाशिर्षातर्गत २७- लहान बांधकामे बाबीखालील निधी वितरीत करून घेण्यासाठी शासनास प्रशासकीय / तांत्रिक मान्यतेचे प्रस्ताव सादर करणेबाबत सूचित करण्यात आले आहे. त्यानुसार कृषि आयुक्तालयाने तालुका फळरोपवाटिका, तिसंगी (रत्नागिरी) व चाविंद्रा येथील दुरुस्तीच्या कामासाठी रु. १५,८०,९१३ (रु.पंधरा लाख, ऐंशी हजार नऊशे तेरा) व शासकीय फळरोपवाटिका येवला, ता.येवला, जि.नाशिक येथील प्रशिक्षण हॉल दुरुस्तीच्या कामासाठी रु. ५,६२,००० (रु. पाच लाख बासष्ट हजार) अंदाजपत्रकास प्रशासकीय व सदर रक्कम वितरण प्रणालीवर वितरीत करण्याचा कृषि आयुक्तालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ (सुधारणा दि.१७/०४/२०१५) भाग-पहिला, उपविभाग ५ अ.क्र. १० परिच्छेद अ. क्र. १३४ नुसार सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिरक्षणासाठी ताब्यात नसलेल्या

इमारतीच्या सर्वसाधारण दुरूस्ती व विशेष दुरुस्ती प्रशासकीय (वित्तीय) मान्यता देण्याचे अधिकार प्रशासनिक विभागास आहेत. त्याचा वापर करुन शासन तालुका फळरोपवाटिका, तिसंगी, ता.खेड जि.रत्नागिरी व फळरोपवाटिका चाविंद्रा,ता.भिवंडी, जि.ठाणे येथील दुरुस्तीच्या कामासाठी रु. १५,८०,९१३ (रु.पंधरा लाख, ऐंशी हजार नऊशे तेरा) आणि शासकीय फळरोपवाटिका येवला, ता.येवला, जि.नाशिक येथील प्रशिक्षण हॉल दुरुस्तीच्या कामासाठी रु. ५,६२,००० (रु. पाच लाख बासष्ट हजार) अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००३०२१६१४२६५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.03.02 16:17:03 +05'30'

**( अशोक आत्राम )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक,नाशिक विभाग / ठाणे विभाग.
४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, ठाणे
५. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,नाशिक.
६. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
७. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,
८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे /नाशिक
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०.सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई -३२,
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
१२.निवड नस्ती (१३-अे).